**महाराष्ट्र राज्य कृषि व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प व प्रधानमंत्री पीक विमा योजनेंतर्गत विम्याच्या हप्त्यासाठी अर्थसहाय्य या योजनेकरीता नोडल अधिकारी, राज्य योजना व्यवस्थापक, First Level Agency, Second Level Agency घोषित करण्याबाबत ...**

**महाराष्ट्र शासन,**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : पीएफएम /प्र.क्र. १४३/१९/२-अे,**
हुतात्म राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ जानेवारी, २०२०.

<u>वाचा :</u> १) कृषि व पदुम विभागाचे शासन निर्णय क्र. पीएफएम-२०१७/प्र.क्र.४५/१७/२-अे, दि. १६.६.२०१७ व दि. ९.८.२०१८
२) अतिरीक्त प्रकल्प संचालक (स्मार्ट) , पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र/पीसीएमयु/लेखा/ पीएफएमएस/३५६/२०१९ दि.०६/१२/२०१९
३) कृषि आयुक्तालय , पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.कृषिआ/सां.८/प्रस्ताव/६/२०२० दि.०६/०१/२०२०

<u>प्रस्तावना</u> :

शासनाच्या धोरणानुसार कृषि विभागाच्या केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्यित योजनांकरिता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) या पध्दतीचा अवलंब करण्यात येतो.सदर प्रणालीच्या अंमलबजावणीकरिता संदर्भिय शासन निर्णयान्वये नोडल अधिकारी, राज्य योजना व्यवस्थापक व First Level Agency शासनाकडून घोषित करण्यात आलेले आहेत. याच धर्तीवर महाराष्ट्र राज्य कृषि व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प व प्रधानमंत्री पीक विमा योजनेंतर्गत विम्याच्या हप्त्यासाठी अर्थसहाय्य याची सार्वजनिक वित्तिय व्यवस्थापन प्रणाली (पीएफएमएस) द्वारे अंमलबजावणी करण्याकरीता नोडल अधिकारी, राज्य योजना व्यवस्थापक व First Level Agency, Second Level Agency, मेकर व चेकर घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

<u>शासन निर्णय</u> :

कृषि विभागाच्या केंद्र पुरस्कृत व केंद्र सहाय्यित योजनांकरीता सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीच्या (पीएफएमएस) अंमलबजावणीकरिता उपसिचव / सहसचिव (अर्थसंकल्प व नियोजन) यांना कृषि व पदुम विभागाने दि. १६/६/२०१७ व दि. ९/८/२०१८ च्या शासन निर्णयान्वये नोडल अधिकारी म्हणून घोषित केलेले आहे. उपसिचव / सहसचिव (अर्थसंकल्प व नियोजन), हे महाराष्ट्र राज्य कृषि व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प व प्रधानमंत्री पीक विमा योजनेंतर्गत विम्याच्या हप्त्यासाठी अर्थसहाय्य याची सार्वजनिक वित्तिय व्यवस्थापन प्रणालीद्वारे अंमलबजावणी करण्याकरीता नोडल अधिकारी राहतील. तसेच, उक्त दोन योजनांकरीता राज्य योजना व्यवस्थापक, First Level Agency, Second Level Agency, मेकर व चेकर पुढीलप्रमाणे घोषित करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | योजनेचे नाव | राज्यस्तरीय योजना व्यवस्थापकाचे पदनाम | First Level Agency |
|---|---|---|---|
| १ | महाराष्ट्र राज्य कृषि व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प | सहसचिव / उपसचिव (कार्यासन ८ अे) | कक्ष अधिकारी / अवर सचिव (कार्यासन ८ अे) |
| २ | प्रधानमंत्री पीक विमा योजनेंतर्गत विम्याच्या हप्त्यासाठी अर्थसहाय्य | सहसचिव / उपसचिव (कार्यासन ११ अे) | कक्ष अधिकारी / अवर सचिव (कार्यासन ११ अे) |

**राज्य योजना व्यवस्थापक** :- राज्य योजना व्यवस्थापक यांनी योजना राबविण्यासाठी राज्य स्तरावर First Level Agency निर्माण करुन त्यांचा प्रशासक म्हणून व त्यांच्या अधिनस्त असलेल्या अवर सचिव / कक्ष अधिकारी यांची नेमणूक / आवश्यकतेनुसार बदल करणे तसेच, पीएफएमएस प्रणालीवर योजनेशी संबंधित प्रशासकीय / तांत्रिक या बाबी हाताळतील.

**First Level Agency** :- Second Level Agency निर्माण करण्याची / आवश्यकतेनुसार बदल करण्याची जबाबदारी First Level Agency च्या प्रशासकाची राहिल. महाराष्ट्र राज्य कृषि व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प करीता Second Level Agency चे प्रशासक म्हणून योजना राबविण्यास सक्षम असलेले प्रकल्प संचालक (SMART), पुणे हे राहतील. तसेच प्रधानमंत्री पीक विमा योजनेंतर्गत विम्याच्या हप्त्यासाठी अर्थसहाय्य करीता Second Level Agency चे प्रशासक म्हणून कृषि आयुक्त स्तरावरील योजना राबविण्यास सक्षम असलेले संचालक/सहसंचालक/उपसंचालक दर्जाचे अधिकारी राहतील.

**मेकर व चेकर** :- महाराष्ट्र राज्य कृषि व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प सार्वजनिक वित्तिय व्यवस्थापन प्रणालीद्वारे राबविण्यासाठी सहाय्यक लेखाधिकारी (स्मार्ट), पुणे हे मेकर असतील तसेच विशेषज्ञ (स्मार्ट), पुणे हे प्राथमिक चेकर असतील व अतिरीक्त प्रकल्प संचालक (स्मार्ट), पुणे हे अंतिम चेकर असतील. तसेच प्रधानमंत्री पीक विमा योजनेंतर्गत विम्याच्या हप्त्यासाठी अर्थसहाय्य ही योजना सार्वजनिक वित्तिय व्यवस्थापन प्रणालीद्वारे राबविण्यासाठी लेखाधिकारी (लेखा -१ ) हे मेकर असतील व सहाय्यक संचालक (लेखा-१) हे चेकर असतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२२१६३९४८९९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Suhas Madhusudan Sakpal

Digitally signed by Suhas Madhusudan Sakpal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=01592dd98f36fbc924826517361a31b8166fce7745d35b95fa79159b8fb74478, serialNumber=82434617b1f4c6035b3cc29788b8d394a52fb3edabfc26b4e85ebc2af7c45ff9, cn=Suhas Madhusudan Sakpal
Date: 2020.01.22 16:41:16 +05'30'

**( सुहास सकपाळ )**
**कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१ सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई

२ कृषि आयुक्त , महाराष्ट्र राज्य, पुणे
३ संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि व ग्रामीण परिवर्तन प्रकल्प, पुणे.
४ संचालक ( सर्व ) कृषि आयुक्तालय, पुणे
५ कृषि सहसंचालक (सर्व) कृषि आयुक्तालय, म.रा. पुणे
६ संचालक ( लेखा व कोषागारे) मुंबई,
७ सहसंचालक (सुधारणा ) संचालनालय,लेखा व कोषागारे,नवीन प्रशासकीय भवन,५ वा मजला, मंत्रालय, मुंबई
८ सर्व विभागीय कृषि सहसंचालक / जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी (सर्व) /तालुका कृषि अधिकारी (सर्व )
९ महालेखाकार कार्यालय, मुंबई /नागपूर
१० सर्व सहसचिव / उप सचिव /अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
११ सहाय्यक संचालक (लेखा-१/२), कृषि आयुक्तालय, पुणे
१२ वित्त विभाग (व्यय - २ / अर्थ - १३/ कोषा प्रशा-५) मंत्रालय,मुंबई
१३ लेखाधिकारी (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, पुणे
१४ उप महाप्रबंधक, डिजिटल आणि लेणदेण बँकींग शासकिय व्यावसायिक विभाग, सायनरजी सी-६ / जी ब्लॉक बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, बांद्रा पूर्व मुंबई- ४०० ०५१.
१५ निवड नस्ती ( कार्यासन २-अे ).